वेदांतांबुधिमग्नमानसतया निर्मुक्तरत्यादिना
ब्रह्मानंदसुधारसेन सकलं संजीव्यते येन वै ॥
विश्वं स्वार्थहतं सुदीनसदृशं दारादिभिर्मोहितं ॥
पूर्णानंददयानिधिं गुरुमहं नारायणाख्यं भजे ॥ १ ॥

श्रीगणेशाय नमः ॥ नमोजी वक्रतुंडा ॥ कृपानिधी प्रचंडा ॥
परिपूर्णत्वें उदंडा ॥ परी वेगळाचि तूं ॥ १ ॥ मग नमूं ते भार-
ती ॥ जे निजानंदें निजशक्ती ॥ जिणें अव्यक्त आणिलें व्यक्ती ॥
सत्तामात्रें पैं ॥२॥ नमूं तो स्वरूपसद्गुरु ॥ पूर्णानंदें अमृतकरु ॥
जयाचे कृपेनें निर्धारु ॥ कळे स्वस्वरूपाचा ॥ ३ ॥ तो शिष्य-
समुदाया पीयूष ॥ कीं कृपेचा सुधारस ॥ जयाचे अवलोकनें आ-
यास ॥ चुकताती ॥ ४ ॥ तो सर्वदा मंगळमूर्ति ॥ आणि नित्या-
नंदें पूर्णस्थिति ॥ जयाचेया वचनें वृत्ति ॥ स्थिरत्वें राहे ॥ ५ ॥
स्थिरावया वृत्तीचें चिन्ह ॥ अन्यथा नाहीं वो साधन ॥ जे वंदा-
वे चरण ॥ श्रीगुरूचे ॥ ६ ॥ यया निर्धारावरी ॥ गुरु आहेति
घरोघरीं ॥ मंत्रआगमकुसरी ॥ उपदेशावया ॥ ७ ॥ शिष्याचे

लोभेंकरून ॥ उपदेश मात्र करिती जाण ॥ परी शिष्याचें ज-
न्ममरण ॥ न चुकविती गुरु ॥८॥ तैसा नव्हे माझा निवृत्ति ॥
सखोल बोले श्रुति ॥ करूनि अकर्तृत्वाची स्थिति ॥ सामा-
विली राहे ॥९॥ तेथें शब्दाचें अकारण ॥ उपदेश सांगे वचनें-
वीण ॥ सर्वांगाचि देखणेपण ॥ जयाचेनि ॥१०॥ अवस्थात्रयांचा
देखणा ॥ तुर्यारूपें अवसाना ॥ उन्मनीच्या सुखपणा ॥ जाणता
तो ॥११॥ दृश्याचा होय निरास ॥ दर्शनाचा चुके आयास ॥ द्र-
ष्टेपणें डोळस ॥ तोचि गुरु ॥ १२ ॥ गुरूचेया चरणारविंदा ॥
सुख सुखत्वें पावे दोंदा ॥ मागें सांडोनि आनंदा ॥ परताचि हो-
य ॥ १३ ॥ नेत्रांपुढें धांवतु ॥ असोनियां चक्षूंसि अतीतु ॥ चक्षु-
रूपें जें वर्ततु ॥ तेंचि रूप ॥१४॥ दशेंद्रियांचें ओढण ॥ एकाद-

शांचें कारण ॥ ययाचें समुत्थान ॥ प्रभासे पैं ॥ १५ ॥ बुद्धि
निश्चयात्मक ॥ ययाचें जें द्योतक ॥ कर्तृत्वाचें कवतुक ॥ सांडू-
नि राहे ॥ १६ ॥ अनुभविता स्वस्वरूपासी ॥ आपणचि होणें
निश्चयेंसी ॥ नेणणें जाणणें यासी ॥ प्रकाशरूप ॥ १७ ॥ शब्द
स्पर्श रूप रस ॥ गंध ययां सकळांस ॥ प्रकाशरूपें प्रत्यक्ष ॥ जा-
णतें तें रूप ॥ १८ ॥ ऐसें जयाचे प्रसादें ॥ आणि स्वस्थितीचे-
नि मदें ॥ राहिलीं स्वर्गादिक पदें ॥ अशाश्वतें ॥ १९ ॥ साक्षि-
रूपाची विसंगति ॥ बंधमुक्तीची फिटली भ्रांति ॥ प्रपंचाची वि-
राली मति ॥ असोनियां ॥ २० ॥ तें मावळलेया भान ॥ त-
थापि राहे द्रष्टा होऊन ॥ दग्ध पटदर्शन ॥ मात्रचि असे ॥ २१ ॥
ऐसा गुरूचा उपकारु ॥ उतराई होवावया कवण प्रकारु ॥ ज-

याचेनि स्वस्वरूपाचा निर्धारु ॥ ठसावला असे ॥२२॥ येथ मार्ग भिन्नभिन्न ॥ धरोनियां नानाभिमान ॥ मतें स्थापिती शिष्यालागुन ॥ भ्रमरूप ॥२३॥ लय लक्ष्य नाद उपासन ॥ अष्टांगयोगाचें साधन ॥ परी चुकलें निधान ॥ जवळी असतां ॥ २४ ॥ जैसा कंठींचा मणी ॥ विसरला भ्रमेंकरूनी ॥ कां निधान असतां पार्णी ॥ नाहीं ह्मणे ॥ २५ ॥ एक परमार्थाचें उत्तर ॥ बोलताती वस्तु निराकार ॥ परी देखत्या पुरुषाचा निर्धार ॥ न कळे त्यां ॥ २६ ॥ ज्ञान नाहीं हा आभास ॥ जाणे तोचि स्वयंप्रकाश ॥ न लिंपोनि सर्वांस ॥ व्यापोनि असे ॥ २७ ॥ निवृत्तिचरण वंदून ॥ प्रसाद परम गहन ॥ राहिलों कूटस्थ होऊन ॥ गुणातीत ॥२८॥ सर्व लोहो चाळी ॥ चुंबकशिळा निराळी ॥ तेंविं ॥२॥

तो चाळी सकळी ॥ भूताकृती त्या ॥ २९ ॥ यापरी तो सर्वग-
त ॥सर्व चाळून अचळ होत ॥ तेचि क्रीडा तयाची सत्य ॥
न लिंपोनी ॥ ३० ॥ नाना सरोवरीं कुमुदिनी ॥ तया जळामा-
जी असोनी ॥ न लिंपे तेणेंकरूनी ॥ तैसी वस्तु ॥ ३१ ॥ कीं
आकाशामाजी तरणी असे॥सकळ चाले त्याचे प्रकाशें ॥ परी
तया कर्तलाचें पिसें ॥ आथीचिना ॥३२॥ स्फटिकशिळा ते निर्म-
ळ ॥ परी उपाधिसंगें दिसे बरळ ॥ परी ते स्वयें निर्मळ ॥ उपाधि-
भिन्न ॥ ३३ ॥ भिन्नाचा जो प्रकार ॥ भासमात्रचि पैं कीर ॥
जैसा मृगजळाचा पूर ॥ तन्यायें ॥ ३४ ॥ अहंता अहंतेतें
उठवित ॥ हा भासमात्रचि पैं होत ॥ तया अहंकारातें जें दे-
खत ॥ तेंचि रूप ॥ ३५ ॥ वस्तु सांगायाकारणें ॥ चौघे राहिले

मुकेपणें ॥ अठरांचीं अंतःकरणें ॥ हिंपुटीं झालीं ॥३६॥ साही- स्वा०
जणें खटपटीत ॥ चौदाजणें विवादत ॥ इतुकेयांतेंही जाणत ॥
तेंचि निज ॥३७॥ शशांक मुख्य गगनीं ॥ परी प्रतिबिंब भिन्न
उपाधिजीवनीं ॥ बाहेरी जहालेया उपाधिलागोनी ॥ बिंबचि
असे ॥३८॥ तैसें उपाधीचेनि भेदें ॥ वस्तु भासतसे विविधें ॥
परी तें कूटस्थ विनोदें ॥ साक्षित्वें वसे ॥३९॥ वारा दिसे वागुरे
सांपडला ॥ आणि पाशबंधीं गुंतला ॥ परी तेथूनिही दादुला ॥
निघोनि जाये ॥४०॥ गेला ह्मणों तरी तेथेंचि असे ॥ आपणचि
सर्वही ऐसा दिसे ॥ परी न सांपडे आपैसें ॥ आकाशवत ॥४१॥ ॥ ३ ॥
घटमठउपाधिगगन ॥ उपाधिसंगें दिसे चळण ॥ वास्तव-
विचारें अखंडपण ॥ न जाय त्याचें ॥४२॥ लोहसंगें दाहक ॥ पिटे

एस देखता लोक ॥ परी लोहासीच घाय अनेक ॥ वन्हि जैसा तैसा ॥४३॥ तैसें उपाधिचित्ताचें चेतव्य ॥ आणि बुद्धीचें बोद्ध-व्य ॥ याचेनि तें निरवयव ॥ विकारी दिसे ॥ ४४ ॥ श्रोत्रेंवीण आइकत ॥ जिव्हेवीण चाखत ॥ नेत्रेंविणें देखत ॥ तेंचि एक ॥४५॥ एवं सर्वेंद्रियगत ॥ सर्व करून सर्वातीत ॥ सर्वांसारिखें भासत ॥ परी रूप नाहीं॥४६॥जंव दृश्याचें अवलोकन॥ तंव द्र-ष्टृत्वें करी उत्थान॥सेखीं तयातेंही गिळून॥वेगळेंचि ठाके ॥४७॥ या पांचांमाजील पंचक॥ जडांतें सत्तेनें उठवीत॥ सेखीं तयातें-ही नातळत॥ विलक्षण तें ॥४८॥ जों जों तें पाहूं जात॥ तंवतंव दुरी पळत ॥ सेखीं पाहतांही धांवत ॥ सर्वांहीपुढें॥ ४९ ॥ पुढें ह्मणों तरी जिकडेतिकडे आहे॥ आपणचि वर्ते या देहें॥ सर्वां

सारिखेंचि पाहे ॥ परी रूप नाहीं ॥ ५० ॥ बहुत कठिणाहूनि 
कठिण ॥ सोपें करतळामळकप्रमाण ॥ गुणातीत निर्गुण ॥ गु-
णीं वर्ते ॥ ५१ ॥ प्रथम तें जाग्रतीदशे ॥ रजोगुण नेत्रीं समर-
से ॥ तेथें जागरींच वसे ॥ प्रकाशरूप ॥ ५२ ॥ स्वप्नावस्था स-
त्वेंसी ॥ कंठस्थानसंयोगेंसी ॥ अनुस्यूत देखे यासी ॥ परि वेग-
ळा तो ॥ ५३ ॥ सुषुप्तिदशे तम ॥ जियेचें हृदय धाम ॥ तियेचें
सुख जें परम ॥ जाण तें रूप ॥५४॥ तुर्यावस्थासाक्षिणी ॥ आ-
णि प्रत्यगात्मा यांचा गुणी ॥ परी तियेतेंही विलक्षणी ॥ टाकू-
नि दे ॥५५॥ जाणोनि ठकावले ठाकत ॥ कार्याचियेपरि उभे रा-
हत ॥ सेखीं तयातें सांडित ॥ जाणवेना ॥ ५६ ॥ यया शरीरीं 
वर्तमान ॥ उत्पत्ति स्थिति प्रळय ज्ञान ॥ स्थूळाचें त्रिकाळ-

ज्ञान ॥ जाण ते रूप ॥ ५७ ॥ लिंग ह्मणती जयासी ॥ जें कां वर्ते पंचदशांसी ॥ तयाचें देखणें ययासी ॥ ह्मणोनी वेगळा तो ॥५८॥ आतां पंचदश विकार ॥ ते परिसोत कां चतुर ॥ जयाचा अभिमानी रमावर॥ तें सांगोपां ॥५९॥ पंच प्रकारें मन ॥ दुसरें चित्त तिसरें अंतःकरण ॥ चवथा अहंकार जाण ॥ पांचवी बुद्धि ॥ ६० ॥ पंचतन्मात्रा वर्तमान ॥ पंचभूतांचे सूक्ष्म पंच गुण ॥ यांचें जयासी असे ज्ञान ॥ तें गे तें रूप ॥६१॥ त्रिगुणशबलित ॥ तयांचें जें कर्तृत्व ॥ तयातें जें जाणत ॥ तेंचि रूप ॥६२॥धृतिस्मरण जाणिजे ॥ अथवा विस्मरणभाविजे ॥ तया वृत्तीतें जाणतें जें ॥ तेंचि पैं चिन्मात्र ॥६३॥ चेतनारूपें चेतन ॥ अचेतनें अचेतन॥ययाचें जयासी ज्ञान॥तेंचि चैतन्य॥६४॥आ-

णि प्राणपंचक ॥ जया शरीरा चळणें सकळिक ॥ क्षुधा तृषा कवतुक ॥ प्राणगत ॥ ६५ ॥ यया प्राणा चंचळता ॥ अथवा साधनें करोनि स्तब्धता ॥ यया कर्तृत्वाचा ज्ञाता ॥ तो गे तोचि ॥ ६६ ॥ शोक मोह पावे मन ॥ अथवा असे समाधान ॥ याचें जया ज्ञान ॥ तोगे तोचि ॥ ६७ ॥ अव्यक्तीं इंद्रियें लया जात ॥ तयांचें विस्मरण धृतिनिश्चित ॥ तयाचें जया ज्ञान होत ॥ तोगे तोचि ॥ ६८ ॥ तथापि चित्त असमाधान ॥ विषयासक्त मूढ जन ॥ तयां सर्वथैव नव्हे ज्ञान ॥ कल्पांतवरी ॥ ६९ ॥ तया ज्ञानाची प्राप्ती ॥ करावया नाहीं अन्य साधनयुक्ति ॥ एक ते सज्जनसंगती- ॥ वांचोनियां ॥ ७० ॥ एक व्यर्थ अव्हाटा भरले ॥ षट्चक्रें भेदूं लागले ॥ देखदेखत नागवले ॥ साधून भूतें ॥५॥

॥ ७१ ॥ जेथ ठावोचि नाहीं ग्रामा ॥ तेथ कैंची असेल सीमा ॥
तेवीं निर्गुणा निरुपमा ॥ कैंचीं चक्रें ॥ ७२ ॥ जेथ हा देहत्रया-
तीत॥ मा कैंचा चक्रांचा संघात॥तया देखणत्वें वर्तत ॥ ह्मणो-
नियां ॥७३॥ स्थूल सूक्ष्म कारण ॥ विश्व तैजस प्राज्ञ ॥ जागृ-
त्स्वप्नसुषुप्ती सगुण ॥ तो द्रष्टा ययांचा ॥ ७४ ॥ जेधवां सा-
क्षी ऐसा कळला ॥ तेधवांचि मुक्तिपदा गेला ॥ मुक्त ह्मणों तरी
बांधला ॥ केधवां होता ॥ ७५॥ यया आत्मयाचें रूप कैसें ॥ जें
नाहीं कासया ऐसें ॥ आपणा आपण प्रकाशे ॥ तेंचि तें पैं ॥७६॥
श्वेत नाहीं त्यासी ॥ पीत कर्पूर कृष्ण वर्णासी ॥ रूप आणि रे-
खेसी ॥ स्पर्शचि नाहीं ॥ ७७ ॥ ह्मणावें आकाशवत ॥ तरी तें
पोकळ भासत ॥ तिये पोकळीमाजी घन असत ॥ तयातीत

॥७८॥ आपणामाजी तरी भरलें॥ परी रूपासि नाहीं आलें॥ न- स्वा०
वचे कासयासारिखें बोलिलें॥ तेंगे तेंचि॥७९॥गभस्ति वर्ते ग-
गनीं ॥ त्रिकाळ असे तयातें व्यापुनी॥ तयाचे उष्ण किरणीं ॥
अबाधित ॥ ८० ॥ अथवा तो हुताशन ॥ लीन अथवा देदीप्य-
मान ॥ अथवा धूम्राचें आवरण ॥ तयावरी ॥ ८१ ॥ तयाचे ली-
नत्वें नव्हे शांत ॥ ज्वाळेकरूनियां न पोळत ॥ धूम्रेंकरोनि
अभिभूत ॥ कैंचि नव्हे ॥ ८२ ॥ जयामाजी असे ॥ तेणें अबा-
धित भासे ॥ पुनरपि तयाचें पिसें ॥ लागोंचि नेदी ॥ ८३ ॥
यामिनीपतिकिरण शीतळ ॥ त्या शीतामाजी प्रबळ ॥ व्यथा- ॥६॥
न पवे केवळ ॥ वेगळेंचि ठाके॥ ८४ ॥ तयाचें वर्तुळपण ॥ क्षय
अथवा पूर्ण ॥ मा नलिंपोनियां वर्तमान ॥ तेथेंचि असे ॥ ८५॥

असे ह्मणों तरि न कळे ॥ न लिंपे दृष्टीचेनि मेळें ॥ नेणों ह्मणों तरी एकाचि वेळे ॥ व्यापोनि वसे ॥८६॥ आपणाचि सर्वही करीत ॥ आणि सर्वांमाजी सर्व वर्तत ॥ सेखीं ह्मणे मी साक्षिभूत ॥ ऐसाही नष्ट नव्हे ॥८७॥ नष्ट तो हाही बोल॥ प्रपंच जेथ अवघा फोल ॥ पाहातां तरी सखोल ॥ उथळ बहु ॥ ८८ ॥ दृश्यासी न लिंपे ॥ करूनि कांहींच न घेपे ॥ सर्व आपण परी न लिंपे ॥ दीपवत ॥ ८९ ॥ दीपेंविण कांहींच न पडे दृष्टी ॥ कीं गभस्तीविण नचले सकळ सृष्टी ॥ तैसी जड ग्रंथि याचेनि उठी ॥ परी ह्मणे मी द्रष्टा ॥९०॥ मी ह्मणे हें अहंकारवेष्टित ॥ हे वृत्तीतेंही लाता हाणत ॥ यया द्रष्टृत्वातेंही जाणत ॥ तेंगे तें ब्रह्म ॥९१॥ जंव शब्दाचें उत्थान ॥ तया शब्दातें जाय व्यापून ॥

शेवटीं राहे ज्ञाता होऊन ॥ तेंगे तें ब्रह्म ॥ ९२ ॥ ब्रह्मादि स्वा०
पिपीलिकापर्यंत ॥ एकचि वर्ते अनुस्यूत॥उपाधिवेगळें भास-
त ॥ परि तें एक ॥ ९३ ॥ रजोगुण अहंकार ॥ करी जो कां
व्यापार ॥ तयाचा जो ज्ञाता कीर ॥ तोचि आत्मा ॥९४॥ इच्छा
मद मत्सर ॥ क्रोधादि रजोगुणविकार ॥ याहोनि वेगळा हा
निर्धार ॥ भानुवत् ॥ ९५ ॥ सत्वाचेया पडिभरा ॥ सुखघनप्र-
कारा ॥ न लिंपोनियां विकारा ॥ सांडित असे ॥९६ ॥ तमोगु-
ण निद्रा प्रमाद आलस्य ॥ याचेनीचि तयां समरस ॥ शेवटीं हो-
ऊनि उदास ॥ कूटस्थपणें ॥९७॥ श्लेष्मादिवातपित्त ॥ हे स्थूळ ॥७॥
पैं कुश्चित॥यांत भरले सदोदित॥परी नातळे तयां॥९८॥एक अ-
पुलेया भ्रांति ॥ कुतर्कातें सेविती ॥ ह्मणती ऐक्य तरी एक स्थि-

ती ॥ असावी सर्वां ॥९९॥ एका जाहालिया मरण ॥ तैं सर्वांस हो-
वावें निधन ॥ कां एकाचे सुखदुःखें आन ॥ कां सुखदुःखित ना
॥१००॥ कां एका भोजन मिळालें ॥ तेणें जग पाहिजे धालें ॥ अ-
थवा एकासि मुक्तपण आलें ॥ तरी सर्वहि मुक्त ॥१॥ तरी एथें ए-
कचि दृष्टांत ॥ गभस्ति अंबरीं वर्तेत ॥ घट भरले एक शत ॥ तयां-
माजी बिंबे ॥२॥ एका कुंभा चंचलता ॥ भानुबिंब दिसे हालतां ॥
तरी काय घटां शतां ॥ बिंब चांचल्य पावे ॥३॥ अथवा एक घट
भंगला ॥ तरी काय सर्वांतून गेला ॥ तो तरी असे संचला ॥ घ-
टचि भंगे ॥ ४ ॥ तैसें चिन्मात्रचि सर्वही असे ॥ देहयोगें
आलें गेलें भासे ॥ परी तें वस्तुता आपैसें ॥ गगनवत् ॥ ५ ॥
अंबर भरलें दिसे घागरीं ॥ कुंभास दिधलेया भंवरी ॥ तो भंवत

दिसे तया बरोबरी ॥ परी तें काय भंवे ॥ ६ ॥ भ्रम असतां कुं- भासी ॥ काय भ्रम होय पोकळीसी ॥ तऱ्यायें चैतन्यासी ॥ नाथिलेंचि हें ॥ ७ ॥ कीं लोहोसंगें पीटण ॥ दिसे जैसें पावका- लागोन ॥ तैसें उपाधिसंगें चैतन्य ॥ नाथिलेंचि दिसे ॥ ८ ॥ येकाचें मरण आनासी ॥ येणें न्यायें नपवे मरणासी ॥ सुखदुःख एकाचें एकासी ॥ नव्हे ऐसें ॥९॥ पृथ्वी तरी एक ॥ मठ मंडप गोपुरें अनेक ॥ एकासि लागलेया पावक ॥ येरें कां दग्ध नव्ह- ती ॥१०॥ अथवा पडतां पर्जन्यासी ॥ जळें पतन होय एका- देयासी ॥ तरी काय अवघेया गृहांसी ॥ घात होय ॥ ११ ॥ एक शरीरावयव ॥ दिसतसे बिंबाची ठेव ॥ अवघेया मि- ळोनि नांव ॥ तनूचि पैं ॥ १२ ॥ तेथें येका अवेवासी ॥ प्राणी

स्वा०

॥ ८ ॥

पावे दुःखासी ॥ तरी काय या सर्वांसी ॥ पीडा होये ॥१३॥ एक-
कचि, तरी कपाळ ॥ अर्धसिस उठी एकवेळ ॥ तरीकाय सकळ ॥
दुःख पावे ॥ १४ ॥ अथवा उष्णें नातला ॥ एक हात उदकांत
घातला ॥ तेणें सर्वांगीं वोलावला ॥ हें केवीं घडे ॥ १५ ॥
आतां मायावैभव गहन ॥ सागरीं तरंग आनआन ॥ सर्वांमा-
जी जीवन ॥ एकचि असे ॥ १६ ॥ एकाचि जळीं तरंग उठ-
त ॥ एका घातें अवघे न फुटत ॥ तरी काय तेथें ह्मणिजत ॥
जळ भिन्न ॥ १७ ॥ तैसा आत्मा अनुस्यूत ॥ देखणेपणें सर्वी
असत ॥ परी उपाधिसुखदुःख असे दिसत ॥ तो साक्षी यया-
चा ॥ १८ ॥ दोघांजणां कलहो आरंभला ॥ एकेंएक पीडे पा-
वला ॥ तेथ साक्षी होता ठेविला ॥ तो काय आरंबळे तेणें ॥१९॥

अथवा दोघे इष्ट भेटले ॥ एक एक सुख पातले ॥ तरी देखत्या आनासि जाहले ॥ काय लाभ तेथ ॥१२०॥ तैसा हा न लिंपे सर्वांसी ॥ मा पापपुण्य कैचें यासी ॥ सर्वथा न पवे बंधनासी ॥ मा मोक्ष कैंचा ॥२१॥ एथ एक ऐसें बोलती ॥ पिंड ब्रह्मांड एकस्थिती ॥ तरी देवां कां अधिक शक्ति ॥ मनुष्यांसी न्यून॥२२॥ कृष्णें गोवर्धन उचलिला ॥ येरा गोटा न जाय लोटिला ॥ तरी ऐक्य या बोला ॥ केवीं घडे ॥ २३ ॥ आतां एथें दृष्टांत ॥ वृक्ष तरी एकचि असत ॥ खोड स्थूळ न हालत ॥ फांदिया हालती ॥२४॥ पुढें खांदेयांसी ॥ क्षीणता वृद्धि असे त्यांसी ॥ तरी काय आननामें बोलासी ॥ पावूं सके ॥ २५ ॥ अथवा एक ऐसें पुसे ॥ जें सर्वहि एकचि असे ॥ तरी कुंजर न मरे म-

स्वा०

॥ ९ ॥

नुष्यें ॥ हाणतांक्षणीं ॥ २६ ॥ पिपीलिकेवरी पडतां चरण ॥ तत्काळ तिणें त्यजिजे प्राण ॥ नाना संघटणीं न पवती मरण ॥ पशु नर ॥२७॥ काय कारण कुतर्कासी ॥ तरी परिसा दृष्टांतासी ॥ दीप होतां वातस्पर्शासी ॥ तत्काळ नासे ॥ २८ ॥ तोचि अग्नीसी पवन ॥ स्पर्श होतां होय दीप्यमान ॥ तरी दीप आणि तो पावक भिन्न ॥ असे काय ॥२९॥ तैसें जयाचें स्थूळ शरीर ॥ तेथें तैसाचि शक्तिबळात्कार ॥ उपाधीच लघु थोर ॥ आत्मा इष्ट जैसा तैसा ॥१३०॥ विरिंच्यादि पिपीलिकापर्यंत ॥ ज्ञान एकचि अनुस्यूत ॥ जेंजें कर्तृत्व जेथें होत ॥ जाणीव तेथें सारिखी ॥ ३१ ॥ जनकनृप नृपपण भोगितां ॥ त्रिगुणइंद्रिय अहंता ॥ साक्षित्वें पावला विदेहता ॥ नरोत्तम ॥ ३२ ॥ श्री-

शंकर करी संहार ॥ शेखीं करी जाणिवेचा विचार ॥ कर्तृत्वा- 
चा टाकूनि वेव्हार ॥ ह्मणे मी वेगळा पैं ॥ ३३ ॥ तमोगुण-
संहारण ॥ तें तव तमाचेंचि लक्षण ॥ शंकर तयाचेंही कारण ॥
परी ह्मणे मी द्रष्टा ॥ ३४ ॥ ब्रह्मा रजोगुणीं सृष्टी करी ॥ परी
ह्मणे मी अकर्ता निर्धारीं ॥ हें गुणाचें गुण करी ॥ मी साक्षी
वेगळा ॥३५॥ तैसेंचि विष्णूपासून पालन होत ॥ सेखीं होय त-
या अतीत ॥ हें सकळ सत्वगुण करीत ॥ मी साक्षी त्याचा ॥३६॥
हाचि दावावया चमत्कार ॥ पाठविला दुर्वास ऋषीसि आ-
हार ॥ यमुनेचा वोसरावया पूर ॥ बोलतां अंगना ॥ ३७ ॥ 
कृष्णं बाळब्रह्मचारी ॥ तरी तूं वोसरें झडकरी ॥ मार्ग दि-
धला सुंदरी ॥ मग पावल्या तीरा ॥ ३८ ॥ याचा ऐसा अ-

भिप्रावो ॥ तरी मदनाचें वैभव ॥ तया देखणा केशव ॥ लिंपे
केवीं ॥ ३९ ॥ तैसेंचि तयाचें उत्तर ॥ इतुकें भक्षुनि नि-
राहार ॥ मार्ग दिधला सत्वर ॥ या बोलावरी ॥१४०॥ अ-
भिप्राव ऐसा याचा ॥ क्षुधा तृषा हा भाग प्राणाचा ॥ आपण
साक्षी याचा ॥ ह्मणोनियां ॥ ४१ ॥ आतां हिरण्मय पुरुष ॥
ब्रह्मा विष्णु रुद्र त्याचे अंश ॥ तयां स्वयं प्रसवत ॥ परी
तयांसी लिंपेचिना ॥ ४२ ॥ जेजे कर्तृत्वाची गती ॥ ब्रह्मादि
रुद्रांची ख्याती ॥ आणि हे माया असें करिती ॥ ह्मणोनि जाणे
तो ॥४३॥ यालागीं आपणचि जाला ॥ सकळही आपणचि
करूं लागला ॥ बोल येवूं नेदी दादुला ॥ ह्मणे मी साक्षी
॥ ४४ ॥ तेथचि जें जाग्रत ॥ तयाचा अभिमानी विष्णुसुत ॥

म्हणोनि हे विरिंचि करित ॥ ऐसें जाण ॥ ४५ ॥ लिंगदेह स्व- स्वा० १
प्नींचा ॥ विष्णु अभिमानी साचा ॥ हिरण्मय देखणा तेथिंचा ॥
म्हणोनि वेगळा ॥४६॥ तमोगुणी रुद्र संहारण ॥ हे सुषुप्ती ते-
थिंची खूण ॥ आपण तयाचा जाण ॥ म्हणोनि वेगळा ॥४७॥
एवं सकळ स्वभावासी ॥ विराट जाणे सर्वांसी ॥ म्हणोनि न लिंपे
कर्तृत्वासी ॥ पुरुष तो ॥४८॥ तैसाचि पिंडगती ॥ आत्मा तरी
सर्वांभूतीं ॥ न सांडी साक्षित्वाची संगती ॥ वेगळा असे ॥४९॥
पुरुषीं मायेचा निरास ॥ पिंडीं अविद्येचा नाश ॥ उभयतां
साक्षित्वें सौरस ॥ सहजचि ऐक्य ॥ १५० ॥ मायेचें करणेंचि ॥११॥
ऐसें ॥ एकचि करणें अनारिसें ॥ पुरुषासि लाविलें पिसें ॥ आपुले-
नि बळें ॥ ५१ ॥ प्रथम मायेपासून ॥ पांच भूतें जालीं नि-

र्माण ॥ परी आकाशाहोनि विलक्षणं ॥ पवन असे ॥५२॥ पवन व्याला हुताशनासी ॥ तो घेऊनि उठिला दाहकासी ॥ तो व्याला जीवनासी॥ परी अनारिसा तो॥५३॥जीवनापासोनि जन्म ॥तिये पृथ्वी ऐसें झालें नाम ॥ ते जडत्वें निःसीम ॥ दिसतसे ॥५४॥परी मायावशें तोचि नटला॥ लटिकाचि खेळ आरंभिला॥ शेखीं होवूनियां उरला ॥ वेगळाचि ॥५५॥ एकाची ऐसी बुद्धी ॥ जे असावें निर्विकल्प समाधीं ॥ तरी बोलिजे ज्ञाननिधि ॥ ऐसें मत ॥ ५६ ॥ मतमतांतरें मार्ग ॥ ब्रह्मीं न समाये अनेग ॥ तें समाधीचें अंग ॥ तेथ तो नातळे ॥ ५७ ॥ समाधि ह्मणिजे समाधान ॥ तयाचा राहिजे द्रष्टा होऊन ॥ समाधान अथवा असमाधान ॥ हे धर्म मनाचे ॥ ५८ ॥ तथापि सांगों उन्मनी ॥ गुरुसंप्रदाय करणी ॥ शिष्याच्या माथां ठेवूनि पाणी ॥ उपदेश-

मार्ग ॥ ५९ ॥ नामरूपगुणातीत ॥ अतद्व्यावृत्ति सांगे कृपावंत॥ स्वा०
नायके तरी शक्तिपात ॥ बळेंचि करी ॥ १६० ॥ तैसा तो अनु-
भव कैसा ॥ नोहे सुषुप्तिऐसा ॥ करणेंविण पावे ठसा ॥ उन्मत्त-
वत ॥६१॥ जैसें उन्मत्त द्रव्य भक्षिलें ॥ न झांकोनि नेत्र झांकि-
ले ॥ सर्वांग शोषण पावलें ॥ जडवत ॥ ६२ ॥ सर्व शरीर वि-
कळ ॥ पादपाणी सचळचळ॥ जिव्हा किंचित् बरळ ॥ ऐसी दशा
॥६३॥ मुहूर्तमात्र जालिया ऐसें ॥ ह्मणे चैतन्य ओतिलें मुसे ॥
साक्षित्वें ठसावोनि वसे ॥ सर्वांमाजी ॥६४॥ ऐसें करितां कीर॥
निर्गुण तो गुरुरूप झाला साकार ॥ त्याणें तारिलें सचराचर ॥
संशयो नाहीं ॥ ६५ ॥ जग तरे तयाचेनि नामीं ॥ जेथ वसे ते ॥१२॥
धन्य भूमि ॥ तयाचे संघट्टणसंगमीं ॥ तरती जड ॥ ६६ ॥ जो
न चोरी जाणिवेसी ॥ प्रकट साक्षेपें सांगे जनासी ॥ भाग्येंक-

रूनि एकाद्यासी ॥ प्राप्त होय ॥६७॥ जगाचे न देखे दोषगु-
ण ॥ न बोले निंदावचन ॥ ह्मणे हा सकळ जगजीवन ॥ क्रीडा
करी ॥६८॥ बहुरूपी नाना वेष धरी ॥ आणि त्याची संपाद-
णी करी ॥ विश्वकर्तृत्व मनीं धरी ॥ ऐसेयापरी ॥६९॥ शिष्या-
चे तोडावया पाश ॥ समाधानें न बोले तयास ॥ शब्दाप्रती
कठिणांश ॥ बोलोनच जाय ॥१७०॥ जो जो शिष्याचा अवगु-
ण ॥ तितका सांडवी तयाकडून ॥ नायके तरी एक क्षण ॥ न
राहे तेथें ॥ ७१ ॥ अथवा पडिलेया हटी ॥ क्षणक्षणा लांगे निज-
गोठी ॥ जितुकें पडे तयाचे दृष्टी ॥ तयाचा सांगे निरास ॥७२॥
शिष्यासि ह्मणे सावधान ॥ बापा राहें द्रष्टा होऊन ॥ चित्त स्व-
स्थ करून ॥ प्रवर्तें हिता ॥७३॥ शिष्य अडवाटा भरूं जाय ॥
विषय अथवा सगुण ध्याय ॥ वज्रप्राय वचनघाय ॥ हाणोनि क-

री दृढता ॥ ७४ ॥ जंव पूर्ण होय स्थिती ॥ तंव आन धरूं नेदी चित्तीं ॥ जें कळे त्यावरी जाय वृत्ती ॥ अडवाटा भरे ॥ ७५ ॥ काम क्रोध मद ॥ आनंद अथवा प्रमाद ॥ इच्छा द्वंद्व अहंता मद ॥ वर्तों नेदी पैं ॥ ७६ ॥ शिष्याचें धरी मन ॥ ह्मणे तूं जाला रे पूर्ण ॥ तंव अहंता करी नागवण ॥ शिष्यासि पैं ॥ ७७ ॥ देहीं जाहालेया त्रिदोष ॥ आणि वैद्य आवडलें दे त्यास ॥ तरी निवृत्ति नव्हे रोगास ॥ अधिक पीडी ॥ ७८ ॥ एक उष्णें तापला ॥ त्यापाशीं अनळ चेतविला ॥ तेणेंकरोनि घात झाला ॥ तयाचा पैं ॥ ७९ ॥ तैसें न करी सद्गुरु ॥ वचनमात्रें करी उपचारु ॥ परी शिष्य असावा सादरु ॥ जे इतुकें घे पैं ॥ १८० ॥ वचन श्री- ॥१३॥
गुरूचें चोखटें ॥ काहींच कडुवट न वाटे ॥ आपुलेनि स्वार्थें हित वाटे ॥ मंगळचि मानी ॥ ८१ ॥ पुत्रदारादि संसार ॥ सर्व

प्रपंचव्यवहार ॥ इतुकेंही अर्पूनि भवसागर ॥ उल्लंघी ॥ ८२ ॥ सांडूनि अहंकाराचें घर ॥ द्वप्टृत्वें राहे निरंतर ॥ आपुलेया स्वार्थालागीं सत्वर ॥ भजे श्रीगुरूसी ॥८३॥ विश्वास फळेल आह्मासी ॥ ह्मणोनियां न भजे आणिकांसी ॥ जो आणूनि दे अनुभवासी ॥ तोचि गुरु ॥ ८४ ॥ देहांतीं पावती मुक्ति ॥ हे अवघी लटिकी युक्ति ॥ जितां नये प्रतीति ॥ तरी सकळही मिथ्या ॥८५॥ वचनमात्रें मुक्तपण ॥ राहे सर्वत्र निराळा होऊन ॥ तयाचे वंदी चरण ॥ तो शिष्य उत्तम ॥ ८६ ॥ एकाचें ऐसें मत ॥ ब्रह्म एकचि अनुस्यूत ॥ गुरुशिष्य नेमस्त ॥ कवण कवणाचा ॥८७॥ त्याणें धरोनियां दोर ॥ चढत असतां गिरिपाठार ॥ पावलेयासाठीं तोडिला सत्वर ॥ केला घात आपलाचि ॥ ८८ ॥ कीं निधान पडलेया दृष्टीसी ॥ सत्वर झांकिलें नेत्रांसी ॥ मग पावला

हलें ॥ तयाच्या पाकातें आरंभिलें ॥ तेंही नाम पैं विरालें ॥ जहालें पक्कान्न ॥ ४ ॥ पक्कान्नें होतां उदरगत ॥ जें होय तें जगा कळत ॥ तया मळाची मृत्तिका होत ॥ संशयो नाहीं ॥ ५ ॥ बीज पडलेया भूमीआंत ॥ मोड ऐसें नाम पावत ॥ मोडपणही निमत ॥ जाहलिया दुपानें ॥६॥ मग तितुकेंही तेथेंचि राहिलें ॥ पुढां शाखापल्लव पुष्पा आले ॥ पुष्पाउपरी बीज झालें ॥ बुडाला वृक्ष ॥ ७ ॥ अथवा कनकाचे अळंकार ॥ नाना नामें परिकर ॥ पुनरपि आटणीं निर्धार ॥ स्वर्णचि असे ॥ ८ ॥ कीं घृताची पुतळी ॥ अवयवत्वीं घृतचि भासली ॥ अवयव उपाधि नांवें वेगळीं ॥ परी तें घृत ॥९॥ लेणें कोरिला पर्वत ॥ रूपें तरी अनेकें दिसत ॥ परी पाहतां समस्त ॥ पर्वतचि ॥ २१० ॥ तैसा चिद्रूपपर्वत ॥ संकल्पें उद्भवत ॥

परी सर्वेही ब्रह्म ॥११॥ प्रथम तें निराकार ॥ इच्छामाया आ-
कार ॥ महत्तत्त्व सत्वर ॥ तेथोनि जाहलें ॥ १२ ॥ महत्तत्त्व ज-
नित त्रिविधांसी ॥ प्रथम तम रुद्रवेसी ॥ पंचमहाभूतें नेमेसीं ॥
तेथोनि जाहलीं ॥ १३ ॥ पांचांचे पांच गुण ॥ आणि तन्मात्रा-
दिकारण ॥ इतुकेंही आपण ॥ तोचि जाहला ॥ १४ ॥ तैसा
विष्णु सत्त्वभरित ॥ मनपंचक व्याला नेमस्त ॥ परी हें जाणा
सत्य ॥ तोचि जाहला ॥ १५ ॥ राजस चतुरानन ॥ दशइंद्रियें
तयापासून ॥ इतुकें संकलित होऊन ॥ केलें रूप ॥ १६ ॥ ऐसी-
चि पिंडब्रह्मांडरचना ॥ अधिष्ठात्री देवता जाणा ॥ निर्गुण
तेंचि सगुणा ॥ आलें असे ॥ १७ ॥ पुनरपि याचें संहरण ॥
लया जाय जालें जेथून ॥ पुनरपि घन निर्गुण ॥ हा उभारा भास-
मात्र ॥ १८ ॥ जैसें उदकाचिपासून केवळ ॥ उपजोनि जाला

शेवाळ ॥ त्याणें आच्छादिलें दिसे जळ ॥ परी तें आपचि॥१९॥ स्वा०
कीं भानूचेचि किरण ॥ जळ घेवोनि पावती मेघपण ॥ शेखीं त-
यासीच आवरण ॥ करूनी ठाती ॥२२०॥ तें तैसें चित्स्वरूप ॥
आपणचि जालें आपेआप ॥ आपुला आपण केला लोप ॥ त-
री कैंची वेगळिक ॥ २१ ॥ जैसें रज्जूसी भुजंगत्व नाथिलें ॥
तैसें जगड्वाळ देखिलें॥ परंतु वास्तवत्वें पाहिलें ॥ तरी जग लटि-
केंचि ॥२२॥ बहुरूपी नटे सोंगासी ॥ परी तो नाहीं तेणे वेसीं ॥
उपसंहारें नटासी ॥ मूळआपणचि उरे॥२३॥कवण ऐसें बोलती॥
हे अवघे ब्रह्ममूर्ति ॥ तरी साक्षी सर्वांभूतीं ॥ दुसरा काय ॥२४॥
तरी रूपेंचि ऐसीं ॥ आपणचि जाला आपैसीं ॥ आपण आ- ॥१६॥
पणेया प्रकाशी ॥ आपण सांडी ॥ २५ ॥ जयाचा जो स्वभाव॥
केवीं राहे तयाचें वैभव ॥ आपणचि करी स्वयमेव ॥ परी जाणी-

व न टाकी ॥ २६ ॥ जरी झाला निमग्न ॥ परी न संडी जाणते-
पण ॥ आह्मींचि केलें निरूपण ॥ तरी साक्षी वेगळाचि ॥२७॥
हें गे ऐसें हें एक ॥ आपणचि व्याप्य आणि व्यापक ॥ ऐसें
क्रीडेचें कळलें कौतुक ॥ श्रीनिवृत्तिप्रसादें ॥२८॥ स्वात्मानुभव
मूळज्ञान ॥ ग्रंथ जाहला क्रीडेन ॥ ययामाजी घालोनि मन ॥
कीजे कार्य आपुलें ॥२९॥ हा स्वात्मानुभव ॥ प्रकटार्थ ग्रंथ वै-
भव ॥ करिताजाहला ज्ञानदेव ॥ निवृत्तीचा ॥२३०॥ शके बाराशें-
बारा ॥ तैं केला ग्रंथउभारा ॥ परिसावया संतां चतुरां ॥ ह्मणे नि-
वृत्तिदास ॥ ३१ ॥ इति श्रीज्ञानदेवोकथन ॥ स्वात्मानुभव सं-
पूर्ण ॥ श्रीगुरुकृपेंकरून ॥ संपूर्ण झाला ॥ २३२ ॥ ॥ छ ॥

हें पुस्तक मुंबईंत निर्णयसागर छापखान्याचे मालक यांनीं छापून प्रसिद्ध केलें.

